प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना या योजनेची सन २०२२-२३ मध्ये अंमलबजावणी करण्याकरिता अनुसुचित जाती प्रवर्गाकरिता (केंद्र हिस्सा + राज्य हिस्सा) रु. ६३१.९६ लाख एवढा निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२२/प्र.क्र.१७३/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २९ मार्च, २०२३

वाचा:- १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे, दि. २३.१२.२०२०
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२२/प्र.क्र.१६९/९-अे, दि. २६.०७.२०२२
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२२/प्र.क्र.१७३/९-अे, दि. २१.०९.२०२२
४. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२२/प्र.क्र.१७३/९-अे, दि. २९.११.२०२२
५. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२२/प्र.क्र.१७३/९-अे, दि. २२.०२.२०२३
६. केंद्र शासनाचे इंग्रजी पत्र F.No. FM-११/८७/२०२२-FME, दि. ०८.०२.२०२३
७. राज्य नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. पीएमएफएमई/राज्य हि./२२-२३/६०७७/२०२३, दि. १७.०२.२०२३
८. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. १६.०३.२०२३
९. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र: बीजीटी-२०२२/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प (विघयो), दि. २८ मार्च, २०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (Prime Minister Scheme for Formalization of Micro Food Enterprises (PMFME) राज्यात सन २०२०-२१ पासून पुढील पाच वर्षासाठी म्हणजे सन २०२४-२५ पर्यंत राबविण्यास वरील वाचा येथील दि. २३.१२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. सदर योजना सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्याकरिता वरील वाचा येथील दि. २६.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. १७५.९० कोटी एवढया रकमेच्या आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने वरील वाचा येथील दि. ०८.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये अनुसूचित जाती प्रवर्गापोटी रु. ३७९.१८ लाख एवढा केंद्र हिस्स्याचा (६०%) निधी राज्यास वितरीत केलेला आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने वरील वाचा येथील दि. २८.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनु. जाती प्रवर्गाचा निधी कृषि विभागाकडे वर्ग केला आहे. सदर निधी राज्य नोडल एजन्सी (PMFME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्याकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. ३७९.१८ लाख व समरुप राज्य हिस्सा रु. २५२.७८ लाख असा एकूण रु. ६३१.९६ लाख (रुपये सहा कोटी एकतीस लाख शहाण्णव हजार फक्त) इतका निधी राज्य नोडल एजन्सी (PMFME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखालील बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. एन-०३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना<br>(०१)(२६) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (केंद्र हिस्सा ६०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३७५) | मागणी क्र. एन-०३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना<br>(०१)(२७) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (राज्य हिस्सा ४०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३८४) |

३. सदर रक्कमेचे कोषागारातून आंहरण व संवितरण करण्याकरिता सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषी) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हा स्तरावर कोषागारातून आंहरण व संवितरण करण्यासाठी जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियांचे/वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत/प्रचलित शासन निर्णय, नियम, परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

५. या योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठविणेबाबत दक्षता घ्यावी.

६. विभाग प्रमुख/नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

८. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन त्यानुसार या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यातील सर्व जिल्ह्यात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM), राज्यस्तरीय तांत्रिक संस्था (SLTI) व इतर यंत्रणांकरिता जिल्हा स्तरावर अवलंबावयाच्या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दतीबाबतच्या सूचना निर्गमित करण्याकरिता नोडल अधिकारी (पीएमएफएमई) तथा संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

९. प्रस्तुत आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६ मार्च, २०२३ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच, शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीजीटी-२०२२/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २८ मार्च, २०२३ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२९१५४५३६८३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BABURAO
MAHADU ASOLE

Digitally signed by BABURAO MAHADU ASOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=225c6caaa4fd8ec882bd3bee9539413914b44aad4058d0b3d6d153454b385353, pseudonym=7BBE5961D0F8CD6221BA971FB46E978F56C2A676, serialNumber=7EEFD6CD19B53F91B65DAD89AA72A32B839329DB6184B40A0F533230BD96705E, cn=BABURAO MAHADU ASOLE
Date: 2023.03.29 15:51:07 +05'30'

**( बा. म. आसोले )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंई ४०० ०३२.
३) मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
५) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९) अपर मुख्य सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

१०) प्रधान सचिव (कृषी व फलोत्पादन), कृषी व पदुम विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
११) राज्य नोडल एजन्सी (PMFME) तथा आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१४) राज्य नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१६) सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१७) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१९) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२०) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२१) सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२.
२२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२३) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२४) निवड नस्ती/९-अे.